Convertion in Regular Temparary Establishment:- Shri Bimbisar S. Arak working under Jalvidnyan Prakalpa Nashik

कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदांचे अस्थायी आस्थापनेवरील पदांमध्ये रुपांतरण- **श्री. बिंबीसार शं. आरक जलविज्ञान प्रकल्प नाशिक**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्र. एसयुटी -२०११/ (२०३/२०११)/आ(कामगार)

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :-२७/१२/२०११

**पहावे** :- १) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग रु.अ.आ.१५९६/२२८/सेवा-५, दि.२४.४.२००१

२) अधीक्षक अभियंता, जलविज्ञान प्रकल्प मंडळ, (संकलन ) नाशिक. यांचे पत्र जा. क्र.जविप्रम (सं)/आ-२/२५७४/१० दिनाक १०/८/२०१०.

**प्रस्तावना :**

अधिक्षक अभियंता, आधार सामग्री संकलन, नियोजन व जलविज्ञान मंडळ, नाशिक यांच्या नियंत्रणाखालील जलविज्ञान प्रकल्प विभाग, औरंगाबाद यांनी श्री. बिंबीसार शंकरराव आरक यांची दि १२.११.८२ रोजी रोजंदारी आस्थापनेवर अकुशल मजुर म्हणून नियुक्ती केली होती. तथापि दि १५.१०.८९ रोजी काम उपलब्ध नसल्यामुळे त्यांना सेवेतून कमी करण्यात आले. त्यामुळे त्यांनी सेवेत पुन्हा घेण्यासाठी मा. कामगार न्यायालय, औरंगाबाद येथे दावा क्रः युएलपी ३७९/८९ दाखल केला. सदर प्रकरणी दि २८.११.८९ रोजी कामगार न्यायालयामध्ये पुढील आदेशापर्यंत त्यांची सेवाकपातीस स्थगिती देण्यात आली व सेवेत पुनःस्थापित करण्यात यावे असे आदेश झाल्याने संबंधीत कार्यालयाने श्री. आरक यांना सेवेत पुनःस्थापित केले. दरम्यान श्री. आरक यांनी १/९३ ते ६/९६ या कालावधीतील दैनिक दराचा फरक मिळणेबाबत मा. कामगार न्यायालय, औरंगाबाद येथे् अर्ज (आयडीए) ८/९७ दाखल केला होता. दावा क्र ३७९/८९ चा अंतिम निर्णय दि ११.२.२००० रोजी लागला असता, त्यामध्ये सदर याचिका खारीज करुन शासनाच्या बाजूने निर्णय दिला. श्री. सदर निर्णयाविरोधात श्री. आरक यांनी मा. औद्योगिक न्यायालय, औरंगाबाद येथे रिव्हीजन युएलपी क्र १३/२००० दाखल केला. सदर दाव्याचा दि. २९.२.२००० रोजीच्या अंतरिम निर्णयान्वये मा. कामगार न्यायालयाच्या दि. ११.२.२००० च्या निर्णयास स्थगिती देण्यात आली व जैसे थे स्थिती कायम ठेवण्याचा निर्णय दिला. यानंतर संबंधित श्री. आरक यांनी शासन निर्णय दि २४.४.२००१ मधील परिच्छेद २ नुसार खालील मुद्यांवर तडजोड करुन दावा क्र ८/९७ व १३/२००० अनुक्रमे दि. ८.८.२००१ व दि १६.८.२००१ रोजी मागे घेतले. सदर दावे मागे घेण्याची तडजोड मा. औद्योगिक न्यायालय, औरंगाबाद यांनी मान्य केली असल्याने सदर तडजोड आणिा त्यांचे नियुक्तीचा दिनांकापासून झालेली सेवा विचारात घेवून श्री. आरक यांना कालेलकर करारातील तरतूदींप्रमाणे अकुशल मजुर या पदावर रुपांतरीत अस्थाई आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय दि २४.४.२००१ मधिल तरतुदीनुसार श्री. आरक यांना खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र | कर्मचाऱ्यांचे नाव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. बिंबीसार शं. आरक | रोजंदारी | अकुशल मजुर १.१.१९९० | १.१.१९९५ | अकुशल मजूर | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (५ वा वेतन आयोग ) |

३. श्री. बिंबीसार शं. आरक यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यांत येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

४. अधीक्षक अभियंता, यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत नर्गमित करुन ते संबंधित कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचाऱ्यांचे नांव , पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचाऱ्याच्या व्यक्तीशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचाऱ्याची (नाव, पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे शासन निर्णय दि. २४.४.२००१

सोबतच्या प्रपत्र 'ब' मधील नमुन्यात हमीपत्र (Undertaking) घेवून ते त्या कर्मचाऱ्यांच्या सेवापटात /सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याबाबतीत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत /त्रुटी असल्याची संबंधित कर्मचाऱ्यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचाऱ्यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती, हजेरी पटाच्या प्रती, आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

५. श्री. बिंबीसार शं. आरक यांची वेतन निश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी. तसेच त्यांनी रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून दि. १७.८.२००८ कालावधीतील देय होणाऱ्या वेतन व भत्त्याच्या थकबाकीच्या रकमेपैकी १०० टक्के रक्कम ते स्वखुशीने सोडून देण्यास तयार असल्याचे हमी पत्र लिहून दिले असल्याने त्यांना सदरहू कालावधीतील वेतनाच्या फरकाची रक्कम अदा करण्यात येवू नये. सदर थकबाकीच्या रकमेवर कोणत्याही प्रकारच्या व्याजाची भविष्यात मागणी करण्यात येणार नाही अशाप्रकारचे प्रतिज्ञापत्र संबंधित कर्मचा-याकडून लिहुन घेणे बंधनकारक राहील.

६. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दि. २४ एप्रिल २००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सांकेतांक कमांक २०१११२२७११२७४४१२४४००१ अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत: प्रपत्र ब

**( अ. अ. कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :-**

वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १, मुंबई / महाराष्ट्र - २ नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा , महाराष्ट्र -१,मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर
अधिक्षक अभियंता, जलविज्ञान प्रकल्प मंडळ, (संकलन ) नाशिक
कार्यकारी अभियंता, जलविज्ञान प्रकल्प मंडळ, औरंगाबाद
आस्थापना(कामगार) संग्रहार्थ.